**चंद्रपूर येथे नाटक व लोककलेच्या माध्यमातून महाकाव्यावर आधारित सांस्कृतिक कार्यक्रम आयोजनास व त्यावरील खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४/प्र.क्र.२७/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ५ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक १९ जानेवारी, २०२४.
२. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./१६७६, दिनांक २१ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

"स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सव" च्या निमित्ताने नियमित कार्यक्रमांसमवेत विविध नाविन्यपूर्ण कार्यक्रम आयोजित करण्यात येत आहेत. याच पार्श्वभूमीवर उपर्निर्दिष्ट वाचा येथील क्र. १ अन्वये चंद्रपूर येथे महाकाव्यावर आधारीत कार्यक्रमाचे आयोजन व त्यावरील खर्चास मान्यता देण्यात आली होती. सदर कार्यक्रमासाठी आवश्यक असलेल्या प्रिंटींग, मौंटिंग, होर्डिंग, निवास व्यवस्था, चहा, अल्पोपहार व्यवस्था इत्यादी कामांसाठी रु. १३.०० लक्ष इतका अतिरिक्त खर्च झालेला असून, सदर अतिरिक्त खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर येथे २१ व २२ जानेवारी, २०२४ या कालावधीत आयोजित करण्यात आलेल्या महाकाव्यावर आधारित सांस्कृतिक कार्यक्रमावरील अतिरिक्त झालेल्या रुपये १३,००,०००/- ( रुपये तेरा लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०२), राज्य, नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. यासाठी जिल्हाधिकारी, चंद्रपूर हे नियंत्रण अधिकारी तसेच ते घोषित करतील ते आहरण व संवितरण अधिकारी राहतील. सदर कार्यक्रमाची देयके कार्यक्रम संपन्न झाल्यानंतर सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत शासनास १५ दिवसांत सादर करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांची असेल.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला,

उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील. तसेच, सदर कार्यक्रमाची देयके हा शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून संपूर्णपणे संबधितांना अदा करण्याची कार्यवाही १० दिवसाच्या आत करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची असेल.

नियोजन विभाग अनौ.सं.क्र.२७०/का-१४४३, दिनांक २४ मे, २०२४ व वित्त विभाग अनौ.सं.क्र. ४१८/२०२४/व्यय-१५, दिनांक १९ जून, २०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०८०५१२५१०९६३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

GOPICHAND
PANDURANG CHAVAN

Digitally signed by GOPICHAND PANDURANG CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=2f36b6412b2bad225b8d078a7f80eed5b7d004f917946ac3d5ff416ac9473d48, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0E195B995C4CFBA1B7E199D1B4B48F8A7C4C1AAD3E82FED8E020632824893159, cn=GOPICHAND PANDURANG CHAVAN
Date: 2024.08.05 14:34:30 +05'30'

**( गो. पां. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, चंद्रपूर
४. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२.
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०.महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३.निवड नस्ती, सां.का.४